# पुरंदरवीर मुरारबाजींचे बलिदान

**नरवीर मुरारबाजी देशपांडे यांचे आवेशपुर्ण भव्य स्मारक - किल्ले पुरंदर**



भाग 1

किल्ले पुरंदर

# सध्याच्या पुरंदर गडावरील वास्तू

वास्तू संग्रहालय



तेजस्वी संभाजी महाराज पुतळा



# लढाईच्या मैदानातील किल्ले पुरंदर दर्शन

किल्ले पुरंदरच्या मोहिमेला मुगलांकडील लष्करी कारवाया कशा आखल्या आणि पार पाडल्या गेल्या असाव्यात याचे दर्शन भाग १ मधे दाखवले आहे.



# या शोधकार्याच्या मर्यादा

- ❖ युद्धशास्त्रीय दृष्टीकोनातून आजकालच्या लष्करी आधिकाऱ्यांना आज्ञा मिळाली तर ते संशोधनात्मक स्वातंत्र्य घेऊन, ह्या सारख्या मोहिमा त्या काळातील मर्यादा लक्षात ठेऊन कशा नियोजित करून पार पाडतील या प्रमेयावर हे शोधकार्य आधारित आहे.
- ❖ भारतीय इतिहासात अनेक ठिकाणी ऐतिहासिक लढायांचा तपशील विश्वसनीय पुराव्यांच्या अभावी उपलब्ध नाही.अशा वेळी त्या लढायात सहभागी व्यक्तींच्या जीवनातील वर्तणून, शौर्य, धैर्य, शस्त्रसंभार यांची जाणीव ठेवून या मोहिमा सादर केलेल्या आहेत.
- ❖ प्रत्यक्ष घटना अशाच घडल्या होत्या असा दावा नाही. समरांगण कसे काय घडले असावे अशी शक्यता दाखवण्याचा प्रयत्न आहे.

# पुरंदर मोहिमेतील मुगलांचे घटना चक्र 1

| दिनांक व स्थळ | मुगलांच्या बाजूने घटना |
|---|---|
| ३० सप्टेंबर १६६४ दिल्ली दरबार | औरंगजेबाने मिर्झाराजे जयसिंह यांना सिवाला दफे (नाहीसा) करायची कामगिरी सोपवली. |
| ९ जाने १६६५<br>२० जाने १६६५<br>१० फेब्रु १६६५ | हांडिया पाशी नर्मदापार झाली.<br>ब्ऱ्हानपुर किल्ल्यात फौज एकत्र करून<br>औरंगाबादला मुअज्जमकडे या मोहिमेत त्याची दखल नको म्हणून माहिती दिली. |
| ३ ते ७ मार्च १६६५ | पुण्यात जसवंत सिंहाकडून पुणे विभागाची सूत्रे हाती घेतली. |
| १५ मार्च अखेरपर्यंत | शिवाजींकडून समेटाच्या पत्रांकडे दुर्लक्ष. सासवडला पोहोचले आणि मोहिमेच्या सैन्य पेरणीची सुरवात. |

| दिनांक व स्थळ | मराठ्यांच्या बाजूने घटना |
|---|---|
| फेब्रु १६६५ | महाराजांचे राजगडावरून सैन्य हालचालीवर लक्ष. सासवडकडे जाताना पाहून महाराज लोहगडावर गेले. |
| फेब्रु - मार्च १६६५ | पुरंदरचे किल्लेदार आणि सरनौबत नेताजी पालकर परिंड्याच्या आसपास मुगल मुलुखात धुमाकूळ घालत होते. |
| मार्च १६६५ | आदिल शाहीशी नरमाईचे धोरण ठरवून महाराजांकडून निरोप धाडले जात होते. |
| मार्च १६६५ | अदिलशहाने महाराजांवर दक्षिणेतून मोहिमा काढून आघात केले तर मुगलांना मिळणाऱ्या वार्षिक खंडणीत सूट देऊ करण्याचे मिर्झांचे प्रयत्न बंद पाडायचे होते. |

# पुरंदर किल्ला सर करायच्या काळातील घटना चक्र 2

| दिनांक व स्थळ | मुगलांच्या बाजूने घटना |
|---|---|
| ३० मार्च १६६५ | पुरंदर किल्ला सर करायची सूत्रे दिलेरखानाने घेतली. |
| २ एप्रिल १६६५ | मुगल सरदारांचे सैन्य प्रवासात विखुरलेले असताना छापेमारी करून सतावायचे धोरण महाराजांनी आखले. |
| ३ ते १४ एप्रिल १६६५ | वज्रगडाला तोफांच्या माऱ्याने जेरीस आणले गेले. |
| १५ एप्रिल अखेरपर्यंत | वज्रगडाच्या बुरुजाला सुरुंग पेरून फोडले गेले आणि गड मुगलांनी घेतला. |
| मे - जून १६६५ | महत्वाच्या गडांची नाकेबंदी, पुरंदरची रसद तुटणे, जनतेला त्रास न व्हावा म्हणून तहाची बोलणी सुरु झाली. |

| दिनांक व स्थळ | मराठ्यांच्या बाजूने घटना |
|---|---|
| मार्च १६६५ | पुरंदर किल्लेदाराचे सैन्य हालचालीवर लक्ष. गडाकडे येणाऱ्या तोफांच्या तांड्यांवर हल्ले चालू. जादा कुमकेची महाराजांकडे मागणी. महाराज लोहगडावर गेले. |
| १४ एप्रिल १६६५ | पुरंदर किल्लेदार आणि वज्रगड किल्लेदार गडावरून गोफण गोटे, मोठ धोंडे गडगडत ढकलून पायथ्याशी जमलेल्या मुगल सेनेला वर चढून येऊ दिले जात नव्हते. पुरंदरच्या आसपासच्या मुलुखात मुगलांच्या धुमाकूळास बंधन घातले जात नव्हते. |
| मे १६६५ | पोर्तुगीज, इंग्रजांशी नरमाईचे धोरण ठरवून महाराजांकडून निरोप धाडले जात होते. |
| जून १६६५ | अदिलशहाला मुगलांना मिळणाऱ्या वार्षिक खंडणीत सूट देऊ करण्याचे मिर्झांचे प्रयत्न बंद पाडायचे होते. |

# पुरंदर किल्ला सर करायच्या काळातील घटना चक्र 3

| दिनांक व स्थळ | मुगलांच्या बाजूने घटना |
|---|---|
| ९ जून १६६५ | रघुनाथ पंतांना मिर्झाराजेंनी बेलतुळशी देऊन अभयदान दिले. |
| १० जून १६६५ | महाराज मिर्झांच्या दरबारात हजर झाले. |
| ११ जून १६६५ | कलमातील देण्याच्या वाटाघाटी रात्रीपर्यंत सुरु. गडांची मालकी देण्याला लगेच सुरवात. |
| १२ जून १६६५ | रोहिडगड ताब्यात घेण्यास पाठवला. |
| १३ जून १६६५<br><br>१३ जून १६६५ दुपारी | दिलेरखान तहाच्या वाटाघाटीत वगळल्यामुळे संतापला होता.<br>महाराजांकडून पुरंदरगडाच्या किल्ल्या न लढाई करता मिळाल्याने दिलेरखानाने सत्कार केला. |
| १४ जून १६६५ | तहाची बोलणी सुरु. औरंगजेबास मान्यतेस तहनामा मसूदा रवाना झाला. |

| दिनांक व स्थळ | मराठ्यांच्या बाजूने घटना |
|---|---|
| ९ जून १६६५ | महाराजांनी राजगड सोडला. नसरापुरच्या भागात येऊन ते थांबले. |
| १० जून १६६५ | चिव्हे घाटात घोडस्वारी सोडून ते पालखीत बसून पुढे निघाले. मिर्झा राजेंनी मानाचा हत्ती पाठवून आपल्या शामियान्यापर्यंत आणले. |
| ११ जून १६६५ | उपस्थित सरदारांची तोंड ओळख आणि मान पानाचे आदान प्रदान झाले. महाराजांनी आपल्या बाजूच्या प्रधान सल्लागारांशी आधी काय ठरले आहे याची उजळणी केली असावी. |
| १२ जून १६६५ | पोर्तुगीज, इंग्रजांशी नरमाईचे धोरण ठरवून महाराजांकडून निरोप धाडले जात होते. |
| १३ जून १६६५ | दिलेरखानाला 'या घ्या किल्ल्याच्या चाव्या. त्या द्यायला आलो आहे!' |
| १४ जून १६६५ | सिंहगड किरत सिंहाच्या हाती गेला. जिजाबाईंसह सर्वांनी गड सोडला |

# लढाईच्या मैदानातील किल्ले पुरंदर दर्शन

किल्ले पुरंदरच्या मोहिमेला मुगलांच्या कडील लष्करी कारवाया कशा आखल्या आणि पार पाडल्या गेल्या असाव्यात याचे दर्शन भाग 1 मधे दाखवले आहे.

शामियान्यातील पुरंदर वाटाघाटीतील धाक आणि तडजोडीचे राजकारण दर्शन भाग 2 मधे दर्शवले आहे.






# पुरंदर दर्शन

वज्र गड

पुरंदरगडावरून वज्रगडाचे दर्शन

om Purandar Fort

Suresh Isave • 7/2012

# पुरंदर दर्शन

पुरंदर  माचीचे सध्याचे रूप

सर दरवाजा

# सासवडकडून सध्याचे पुरंदर गड दर्शन

प्रति बालाजी
मंदिराकडे

Pongade Farm

Veer Murar baji
Deshpande statue
वीर मुरार बाजी
देशपांडे पुतळा

Puratan Shiva Mandir
पुरातन शिव मंदिर

सासवडकडे

# किल्लेदारामार्फत महाराजांना सैन्य हालचाली कळवल्या गेल्या...

पुरंदर किल्लेदाराने लावलेल्या दिवे, कनिफनाथ, बोपदेव घाट माथ्यावरच्या टेहळणी तुकड्या मुगल सरदार, सैन्य, तोफा, हत्ती, घोडे, सामान वाहक जनावरे यांची मोजणी करून महाराजांना कळवले गेले.

सैन्य जनावरांची, तोफांची मोजणी

३० मार्च १६६५ पर्यंत सासवडकडून पुरंदर किल्ल्याला फास लावून राजगड सिंहगड, लोहगड यांना अलग करायची खेळी सुरु झाली....

# दिवाघाट चढल्यावर एका गढीत मिर्झाराजें राहिले कदाचित सासवडच्या अलिकडे जाधवगढी सारखी ती तेंव्हा असावी



# दिलेरखानाशी पहिली झडप...



# पुरंदर दर्शन

चर्चच्या पार्श्वभूमीवर वज्रगडाच्या बालेकिल्याचा उंच भाग

Maruti temple

Safed aani Kala Buruj

मारुती मंदिर

सफेद व काळा बुरूज

सफेद बुरुज

काळा बुरुज

पद्मावती तलाव




उत्तर दरवाजा

Uttar Darwaja

Delhi Darwaja

महाद्वार

Mahadwar

बालेकिल्ला

भैरवखिंड खिंड

# पुरंदर दर्शन

शिरवळकडील परिसर दृष्य

Shri Shivaji Maharaj Statue
श्री शिवाजी महाराज पुतळा

भैरवखिंडीतून एका बाजूला दूरवर नारायणपुर आणि पलिकडील शिरवळ परिसर दिसते.

भैरवखिंड परिसर सध्या रुंद कॉंक्रीट रस्त्यामुळे असा दिसतो

नारायणपुर कडील परिसर दृष्य

# मिर्झाराजे यांची मुख्य छावणी व रचना

❖मिर्जाराजे सर्व गड पुर्ण नजरेच्याटप्प्यात राहावा अशा साठी नारायणपुरच्या पठारावर आपल्या उंची शामियन्यात डेरा ठेवून होते. निवडक सैन्य हत्ती, घोडे, शाकाहारी खानपान व्यवस्था होती. दरबारात रोजचा सैन्य आढावा, सल्ला मसलतीसाठी वकील, कारकून व हिशोबनीस वगैरे घेत असत होते.

❖चैन, चुकारपणा, ढिलाई होऊ नये म्हणून प्रत्येक सरदाराला दिलेल्या कामात उसंत न मिळता पावसाळ्याच्या आत १५ मार्च ते १५ जून पर्यंत ३ महिन्याच्या आत त्यांना "सिवाचा बंदोबस्त" मोहिम यशस्वी करून परतायचे होते.

❖पुरंदरचा किल्ला जिंकायची जबाबदारी दिलेरखानावर सोपवली. त्यानी दिलेरखानाच्या मदतीस आणखी तीन हजार लोक व वेढा घालण्यास लागणारी साधनसामग्री रवाना केली.

# मुरब्बी सेनापती मिर्झाराजेंची दूर दृष्टी

❖मिर्झाराजे स्वतः पुरंदरच्या मोहिमेवर डोळ्यात तेल घालून जागत होते.

❖किल्ला आपल्या शामियान्यापासून दूर पण नजरेत राहावा अशी युक्ती केली.



# पुरंदर व वज्रगडाला फास लागला...



# पानवडी, काळदरी, रामदरीतील सरदार नियुक्ती आणि जबाबदाऱ्या

- पानवडी, काळदरी, रामदरी विभाग - दाऊदखान कुरेशी खूप मोठ्या फौजेनिशी बांदलवाडी आणि बहिरवाडीच्या दरीत उतरला.
- या बाजूने भैरवखिंडीत जाता येते व इकडूनच गडाचा आणखी एक दरवाजा ज्याला केदार दरवाजा म्हणतात.
- या बाजूने नाकेबंदी पक्की व्हावी म्हणून दाऊदच्या मदतीला राजा रायसिंह राठोड, मुहम्मद सालीह कुर्बान, रामसिंह.
- सय्यद झैनीत आबीदीन, बुटवारी हुसैन दाऊद, रसुलबेग रोझभानी, शेरसिंह राठोड, कुंवर राजसिंह राठोड इत्यादी दाऊदच्या बरोबर होते.

# दिलेरखानाने टेकडीवरील आघाडीच्या छावण्या लावल्या




- ❖मिर्झाराजे व सिवा हे दोन्ही काफर हिंदू एकत्र येऊन वेगळा बेत करू शकतात. ही शक्यता जाणून औरंगजेबाने आपल्याला नेमलेले आहे.
- ❖आपण वैयक्तिक पराक्रम करून पंच हजारी सरदार म्हणून खिल्लत मिळवायची हे दिलेरखानाचे लष्करी ध्येय होते.

# सुपे विभाग आणि दिलेरखानाचा विभाग

- ❖ सुपे विभाग - आतीशखान हा मोगलांचा तोफखाना प्रमुख होता. दिलेरचे गैरत अली, मुज्जफर दिलेरचे पुतणे होते. किरतसिंह मिर्जाराजाचा कुंवर, पुरंदर आणि वज्रगडाची उत्तरेकडून आपापले सैन्य घेऊन चढाई करायला प्रयत्न करत राहिले.
- ❖ दिलेरखानाचा विभाग - पुरंदरचा याबाजूने वेढा आवळला जात असतानाही मराठे रात्री अपरात्री छापे घालून मोगलांना झटके देतच होते. एका रात्री मराठ्यांनी गडावरुन खाली उतरुन कीरतासिंहाच्या मोर्चावर हल्लाबोल केला.



# मराठ्यांच्या रातोराच्या छापेमार कारवाया

❖ मराठे पुन्हापुन्हा रात्रीच्या गडद अंधाराचा फायदा घेत केदार दरवाजातून खाली उतरून मुगल तळांवर छापे टाकत होते.

❖दक्षिणेकडून एक तोफ दररोज पुरंदरवर आग ओतायची. तिचे तोंड बंद करण्यासाठी मराठे खाली आले.

❖रसुलबेगचा हा तळ होता. तळावरील लोक अंमळ बेसावधच होते. तेंव्हा मराठ्यांनी धाड घालून दिसेल तो कापून काढला.

❖एका मावळ्याने तशा अंधारातही ती तोफ हुडकून काढली आणि तिच्या कानात मेख घालून तिच्यावर हातोड्याने घाव घालून तोफ कायमची निकामी केली.





# मुगलांची घेराबंदीची पद्धती

❖शत्रूच्या तटबंदीचा भंग करण्यासाठी दोन पद्धती वापरल्या जात - खाणकाम आणि सॅपिंग. (भुयारी खंदक खणण्याचे काम)

❖खाण कामगारांनी गडाच्या तटबंदी खाली बोगदा तयार करणे. आणि बोगद्यातून स्फोटके पेटवून बुरुज किंवा तटाला  भगदाड पाडणे.

❖सॅपिंग - सैन्याने लपत तटापर्यंत पुढे जाण्यासाठी चर किंवा खंदक खोदून कव्हर प्रदान करणे.

❖सर्वात महत्त्वाचे म्हणजे जड तोफा तटाच्या रुंद भिंती आणि बळकट दरवाजे फोडायला मचाण उर्फ दमदमा उभा करणे.





# मुगलांची घेराबंदीची पद्धती



रणांगणावरील पसारा



दमदमे तटासमोर बनताना खंदक खोदकाम चालू

- तटबंदीवरून किल्लेदार आपले सैनिक पाठवून खंदक-चर खणणाऱ्यांवर हल्ला करू नये म्हणून लाकडांनी छप्पर लावणे.
- खंदकात दारू गोळ्यांची आग पसरू नये म्हणून चर वाकडे तिकडे बनवणे.
- कामगार आणि कारागिरांवर काम करताना हल्ला होऊ नये म्हणून सतत शिपायांचा पहारा ठेवणे.
- मुगलांकडील तोफचीच्या सल्ल्यानुसार मचाणे किवा दमदमे कुठे आणि किती वेळात बनवले जाऊ शकतात यासाठी सुतार, गवंडी,बिगार, दोरखंड, तोफगाडे ओढायला लागणारी बैलांची व्यवस्था करणे.

# पुरंदरच्या वेढ्यातील मिर्झाराजेंची योजना

१. जमवलेल्या माहितीवरून उपलब्ध लोकांकडून गडाचा नकाशा मार्ग, तोफा लावायला दमदमे तयार करायला लागणारे मजूर आणि कारागीर लाकूडफाटा, लोखंडी घण, हातोडे, तोफगाडे तोडफोड साहित्याच्या मोजणीसाठी यांच्यात बैठका होऊ लागल्या असाव्यात.

२. किल्लेदारांवर दबाव वाढवला कि सिवा याठिकाणी आपणहून लढायला येण्यासाठी दिलेरखान आणि अन्य महत्वाच्या सरदारांच्या बैठका रोज होऊ लागल्या असाव्यात.

३. एकट्या पुरंदरवर दबाव न टाकता सिंहगड, लोहगड, राजगडला मिळणाऱ्या सर्व मार्गावर आपल्या सैन्याच्या फौजा पाठवून  सिवाला रसद आणि सैन्य भरती करून पुरंदर आणि वज्रगडाला मदत तोडून दोन्ही किल्लेदारांना एकटे पाडायचे असा निर्णय घेतला गेला असावा.



# लष्करी डावपेच

- पुरंदर गडाची रचना पाहता, तोफांचा लांब पल्ल्याचा भडिमार केल्याशिवाय गड सर करणं अशक्य होतं. म्हणून अधिक तोफा तैनात करण्याची योजना आखण्यात आली.
- राजगड, सिंहगड, लोहगड या पट्टीतील किल्ल्यांमधून शिवाजी महाराज सैन्य पाठवू शकतील, ही शक्यता लक्षात घेऊन नाकेबंदी करण्यासाठी सरदार नेमले गेले.
- याशिवाय, काही हजार घोडदळ फिरते ठेवून पुरंदरला मदतीपासून पूर्णतःतोडलं गेलं. शिवाजी महाराज कोकणात पलायन करू नयेत, म्हणून कोकण पट्टीतील सिद्दीला सक्रिय करण्यात आलं.

# पुरंदर किल्ला दिलेरखानाने व सिंहगड आपण स्वतः जिंकाये नियोजन मिझाराजेंनी केले.

- ❖ मुगलांकडून जबरदस्त मोहिम पाहून अफजलखानाचा मुलगा फाज़ल खान, कर्नाटकातील जागिरदार, जव्हारचे कोळी, इतर सरदार मिर्झांकडे येत राहिले.
- ❖ सिंहगड, राजगड आणि पुरंदरवर बारीक लक्ष ठेवायला सासवडला लष्करी हालचालींचे मुख्य केंद्र बनवले.



# सिंहगड, राजगड आणि पुरंदरवर बारीक लक्ष ठेवायला सासवडला लष्करी हालचालींचे मुख्य केंद्र बनवले



# लोहगड, विसापुर आणि राजगडाची मांडणी

लोणावळ्याजवळील

लोहगड

विसापुरगड

राजगड

शिवाजी महाराजांच्या राजधानीचा गड

Bhaja Buddhist Caves

Visapur Fort
विसापूर गड

Vinchukada
विंचूकडा

Lohagad Fort Forest

Pali
पाली

Padmavati Maachi
पद्मावती माची

Daru Gola kothar

राजगड मुख्य दरवाजा

Rajgad Fort
किल्ले राजगड

Gunjavane Darwaja
गुंजवणे दरवाजा

आळू दरवाजा

Duba
डुबा

Sanjivani Machi
संजीवनी मची

# पुरंदर किल्ला लष्करी हालचालींचे मुख्य केंद्र



# पुरंदर किल्ल्याचा कडेकोट बंदोबस्त

❖पुरंदरचा किल्ला जिंकायची जबाबदारी दिलेरखानावर सोपवली. त्यानी दिलेरखानाच्या मदतीस आणखी तीन हजार लोक व वेढा घालण्यास लागणारी साधनसामुग्री रवाना केली.

❖मिर्जाराजे स्वतःपुरंदरच्या मोहीमेवर डोळ्यात तेल घालून जागत होते. त्याला आपल्या शामियान्यापासून पासून दूर पण नजरेत राहावा अशी युक्ती केली.

# मुगलांची घेराबंदीची तयारी 1

❖१. गडावर जायचे दरवाजे शोधून त्या ठिकाणी जायच्या वाटा बंद करणे.

❖२. गडावरील सर्व दरवाजांवर २४ तासाची पहारा ठाणी बसवणे.

❖३. गडावरून खाली दिसणाऱ्या पहारा ठाण्यांना बंकर समान लपायची सोय करणे.

❖४. गडांवरून बाहेर पडायला किंवा लपून वर चढणाऱ्या सैन्याव्यतिरिक्त लोकांना पकडून वरील भागातील रचना, बालेकिल्ल्याची, दारूगोळा, धान्य कोठारांची पाण्याच्या तलावांची माहिती काढायला मदत घेणे.

# मुगल सरदारांना दिलेरखानाने दिलेली जबाबदारी

❖५ . गडावरील माहिती प्रमाणे मुख्य दरवाजा तोडायला किती दूर आणि उंचीवर तोफा, गोळे, तोफचींना न्यावे लागतील याचा अंदाज करून, तिथे पर्यंत तोफगाडे पोचायला रस्ता बनवणे.

❖६ . गडावरून हल्ला थोपवायला खंदक खणून मार्गात अडथळे निर्माण करणे. गडा पर्यंत पोहोचले की बुरुजांच्या आसपास खंदक खणून तो स्फोटक दारूने उडवून द्यायचा. भगदाड पाडून मुगल सैन्याला किल्ल्यात जायला मार्ग बनवणे.

❖७ . मधल्या काळात किल्लेदाराला पैसै, पद याची लालूच दाखवून किंवा  धमकावून किल्ला सैन्य कारवाई न करता ताब्यात घेणे.

# दिलेर खानाचे सरदार लागले कामाला

❖८.रसद पुरवणारे आसपासच्या खेड्यातील हमाल, घोड्यांवरून वाहतूक करणारे, पालख्या किंवा डोल्या वाहून नेणारे यांना पकडून गडावरील लोकांची संख्या, सैन्याची ठाणी, किल्लेदाराचे नाव, शोधून सर्व माहितीचे अहवाल सरदार मिर्झाराजे यांना पुरवले जाऊ लागले.

❖९.त्यावरून उपलब्ध कारागिरांकडून गडाचा नकाशा मार्ग, मातीचे मॉडेल बनवले गेले. तोफा लावायला दमदमे तयार करायला लागणारे मजूर आणि कारागीर यांच्या बैठका होऊ लागल्या.

❖१०. किल्लेदारांवर दबाव वाढवला कि सिवा याठिकाणी आपणहून लढायला येण्यासाठी दिलेरखान आणि अन्य महत्वाच्या सरदारांच्या बैठका रोज होऊ लागल्या असाव्यात.

❖११ . एकट्या पुरंदरवर दबाव न टाकता सिंहगड, लोहगड, राजगडला मिळणारे सर्वमार्गावर आपल्या सैन्याच्या फौजा पाठवून सिवाला रसद आणि सैन्य भरती करून पुरंदर आणि वज्रगडाला मदत तोडून दोन्ही किल्लेदारांना एकटे पाडायचे असा निर्णय घेतला गेला असावा.

# पुरंदरगडावर महाराजांकडून नव्याने रसद पोहोचवते असे दि 20 एप्रिलच्या सुमारास हेरांकडून कळल्यावर...



भैरवखिंडीकडे जाणाऱ्या मार्गावर मजबूत उत्तर दरवाजा उभारण्यात आला होता.

पांढरा बुरुज



काळा बुरूज

त्याच्या संरक्षणासाठी दोन्ही बाजूंनी—किंवा एकामागे एक—सफेद आणि काळा बुरुज उभे करण्यात आले, जे शत्रूच्या प्रवेशाला अडथळा ठरावे म्हणून रचले गेले.

# ३ दमदमांनी पांढऱ्या बुरुजाकडे रोख केला









पांढऱ्या बुरुजावर लक्ष केंद्रित करून, दिलेर खानच्या आदेशाखाली मुघल तोफांचा गडगडाट झाला आणि पुरंदरची तटबंदी हादरली.

भैरवखिंड जवळ एक मजबूत दरवाजा बांधण्यात आला होता, जो मागील प्रवेशद्वारावरील हल्ले रोखण्यात आणि किल्ल्याच्या असुरक्षित बाजूचे रक्षण करण्यात महत्त्वपूर्ण भूमिका बजावत होता.

# वज्रगडाच्या माचीला धरून लाकडी मचाणे ( दमदमे) लावले गेले मे महिना पहिला आठवडा



दमदमा १

दमदमा २

दमदमा ३

तोफगोळ्यांनी तटबंदी उध्वस्त करताना वरून पलिते लावलेल्या बाणांचा वर्षाव..



दमदमे  तयार करून काळा व पांढरा बुरुजावर गोळे पडायला लागले...

दमदमा,  लाकडी अडोसे, छताचा गाडा प्रातिनिधिक चित्रे

# काळदरीकडील भागातील मचाणावर लावलेली तोफ रातोरात छापा मारून तोडून टाकली गेली

मुगलांकडून कष्टपुर्वक लावलेले मचाण (दमदमा) त्यावर चढवून लावलेली तोफ, रात्री अचानक हल्ला करून तोडून टाकली गेली. असे हल्ले होताना पाहून दिलेरखानाने आपल्या सैनिकांना आणखी अधिक त्वेषाने लढायला प्रेरित करत राहिला.

प्रातिनिधिक चित्र




प्रातिनिधिक चित्र

# पुरंदरचा सफेद बुरूज स्फोटात उडाला.



❖दिलेरखानाचा विभाग -
पुरंदरचा हा वेढा आवळला जात असताना दिलेरखान स्वतःनेतृत्व करून कारागिरांसाठी भोजन-पाणी शिवाय तटबंदी उडवायला दारूची पोतीवाहतूक, पलिते लावलेले बाण लागून आग लागू नये म्हणून खंदकांना वरून छप्पर करणे या कामांवर जातीने देखरेख करत होता.







❖महाराजांच्या हालचाली -
प्रतापगडावर भवानीमातेच्या दर्शनातून तहाची बोलणी करावी याची प्रेरणा मिळाली. मे शेवटचा आठवडा.

❖शिवाजी महाराजांना तुळजा भवानी मातेच्या दृष्टांतातून नव्या प्रेरणा मिळत असत. ते प्रतापगडावर भवानी मातेच्या मंदिरात दर्शनावेळी तह करणे ही काळाची गरज आहे. असा त्यांच्या विचारांना पुरक कौल मिळाला.



भवानी मातेच्या दृष्टांतातून नव्या प्रेरणा

❖तहाच्या शक्यतेच्या चाचपणी नंतर पत्रव्यवहार करून मुगलांच्या बाजूचे नेतृत्व करणाऱ्या मिर्जाराजेंशी संपर्क साधला गेला. वकिल रघुनाथरावांच्या मध्यस्थी नंतर बेलभंडारा उचलून जीविताला हानी होणार नाही असे शपथपुर्वक आश्वासन मिळाल्यावर शिवाजी महाराजांनी भेटीची तयारी सुरु केली.

❖ मानपानाचे नजराणे, पोषाख, जायचा मार्ग, वाहन व्यवस्था, भेटीची जागा याची खात्री करून भेट १० जून रोजी तह करायला महाराज राजगडावरून नारायणपुरपर्यंत आपल्या अंगरक्षकांसह घोड्यांवरून नंतर मुगल सरदाराच्या देखरेखीत चिव्हेवाडीतळावर हत्तीवरून आले. नंतर मिर्झाराजेंच्या दिमाखदार शामियान्यात पालखीतून पोहोचले असावेत.

# In consultation with his courtiers



# त्यांच्या मंत्रिमंडळाशी सल्लामसलत

| मुरारबाजींची छापा मोहीम | शिवरायांचा विचार विनिमय |
| --- | --- |
| ❖ प्रत्येक गडावर नाके बंदी झाल्याने शिवाजी महाराजांना सैन्यबळ पुरंदरवर वाढवणे शक्य नव्हते.<br>❖ परिस्थितीची गंभीरता ओळखून किल्लेदार मुरारबाजी देशपांडे यांनी दिलेरखानाच्या छावणीवर छापा मारून<br>❖ त्याला ठार मारण्यासाठी मोठी मोहिम आखली. | ❖ शिवाजी महाराज आता जास्त वेळ ताणून किल्ला गमवायची वेळ आली तर त्यानंतर प्रत्येक गडावर हल्ल्यात सैन्य हानी होऊन गड सोडायला लागतील असा विचार करून प्रधान मंडळाशी सल्ला मसलत करत होते. |

सर्व बाजूंनी हल्ले होत असल्याने,
मराठा सैन्याला ताण जाणवू लागला.



# वज्रगड किल्लेदाराची कामगिरी

- ❖वज्रगडचा किल्लेदार विभाग - पुरंदरचा हा उप किल्ला होता. त्या गडावरील किल्लेदाराने मुगल तळावर भरारी हल्ले करत राहायचे. विशेष करून जेवणाची वेळ, नमाजची वेळ, पहाटे सुर्योदयापुर्वी अंधारात हल्ले करून मुगल सैन्याच्या कारागिरांना दमदमे बांधायला, खंदक खणायला आलेल्यांना जखमी करणे ही कामगिरी पुर्वीपासून नेमून दिलेली होती.
- ❖ दमदमा बांधणारा तोफची रसुलबेगचा तळ होता. तळावरील लोक अंमळ बेसावधच होते. मराठ्यांनी धाड घालून दिसेल तो कापून काढला. एका मराठ्याने तशा अंधारातही ती तोफ हुडकून काढलीच आणि तिच्या कानात मेख घालून तिच्यावर हातोड्याने घाव घालून तोफ कायमची निकामी केली.
- ❖ मराठे पुन्हा रात्रीच्या गडद अंधाराचा फायदा घेत केदार दरवाजातून खाली उतरले. दक्षिणेकडून एक तोफ दररोज पुरंदरवर आग ओतायची. तिचे तोंड बंद करण्यासाठी मराठे खाली आले.
- ❖गड सोडायची वेळ आली तर त्यांनी पुरंदरच्या गडाचा आश्रय घ्यायचा. हे पुर्वापार ठरलेले होते.

10 November 2025





# वज्रगड मुगलांच्या ताब्यात आला - 14 एप्रिल 1665

- दिलेरखानाचा विभाग - पुरंदरचा हा वेढा आवळला जात असताना दिलेरखान स्वतः नेतृत्व करून कारागिरांसाठी भोजन-पाणी शिवाय तटबंदी उडवायला दारूची पोतीवाहतूक, पलिते लावलेले बाण लागून आग लागू नये म्हणून खंदकांना वरून छप्पर करणे या कामांवर जातीने देखरेख करत होता.

- **पानवडी** विभागातील मुगल सरदाराने वज्रगडावर मागील बाजू कडून हल्ला करायची आखणी केली होती. **काळदरी विभाग** प्रमुख दाऊदखान कुरेशी खूप मोठ्या फौजेनिशी बांदलवाडी आणि बहिरवाडीच्या दरीतून वज्रगडावर हल्ला करायची आखणी करत होता.

- **रामदरा** विभागातील सरदारांच्या तुकड्यांनी भैरवखिंडीवर एकाच वेळी हल्ल्याची मोहिम सुरु झाली. **सुपे** विभागातील आतीशखान हा मोगलांचा तोफखाना प्रमुख होता. दिलेरचे गैरत अली, मुज्जफर पुतणे होते. किरतसिंह मिर्जाराजाचा मुलगा, पुरंदर आणि वज्रगडाची उत्तरेकडून तोफा आणि दमदमे बांधकामची कारवाई पुर्ण झाली तेंव्हा सगळ्या बाजूने एकदम हल्ला करून वज्रगडाला ताब्यात घ्यायची मोहीम १४ एप्रिलला यशस्वी झाली.



# इकडे तह आणि तिकडे मुरारबाजींची शर्थ ७०० शे वीर कोसळले दिलेरखानावर




- ❖तो दिनांक होता ११ जून १६६५. कदाचित शिवाजी महाराजांच्या लवाजम्याला किल्ल्याच्या माचीवरून मिर्झाराजेंच्या शामियान्यात आलेले पाहून मुरारबाजींनी आपल्याजवळ उरलेल्या ७शे पेक्षा कमी मावळ्यांना ४ कंपन्यात वाटून घेऊन
- ❖दिलेरखानाला जिवे मारण्यासाठी अंतिम मोहिमेची आखणी केली असावी.

# अंतिम, भयंकर हल्ल्याची सुरुवात







दिलेर खान मुख्यालय

- किल्ल्यावरून , त्याचे सैन्य तीन वेगवेगळ्या मार्गांनी खाली उतरले, अंधाराचा आडवा वापर करून मुघल तंबूंना बायपास करून दिलेर खानच्या मंडपाला वेढा घातला.
- कंपन्या १ आणि २ त्यांच्या नियुक्त केलेल्या टेकड्यांवर पोहोचल्या.

- ❖सकाळच्या प्रार्थनेच्या अजानच्या आधी, झोपलेल्या दिलेर खानला पावलांचा आवाज येत असल्याचे जाणवले. त्याने आपली तलवार घेतली, पगडी आणि शाल स्वतभोवती गुंडाळली आणि आपल्या तंबूबाहेर डोकावले.
- ❖अचानक, त्याला मराठे हल्ला करण्याच्या तयारीत असल्याचे दिसले. त्याने "अल्लाहू अकबर! दिन दिन!" असा जयजयकार करून आपल्या सैनिकांना झोपेतून उठवले.





# निकराच्या हल्ल्याची सुरवात

- ❖ मुरारबाजींनी दिलेरखानाला पाहिले आणि तलवारी भिडल्या. कंपनी कमांडर आपापल्या दिलेल्या तंबूममधील जनावरे त्यांची निगरानी करणाऱ्या लोकांवर तुटून पडले. दिलेरखानाला एकटा पाडला गेला. तोवर झालेल्या आवाजांच्या गलक्याने आसपासचे मुगल सरदार आणि सैनिक शस्त्रे घेऊन सरसावले.
- ❖ मुरारबाजींना वेढा टाकून घेरले गेले. त्या गंभीर प्रसंगात मुरारबाजींनी मोठमोठ्यांनी आपल्या सैन्याला हरहर महादेव असा वीरोचित ललकीरी देत चेव आणला.



# निकराच्या हल्ल्याची सुरवात

- दिलेरखानाला जिवे मारण्यासाठी अंतिम मोहिमेची सुरु झाली.
- मुरारबाजींचे मावळे गडावरून ३ वाटांनी अंधाराचा फायदा घेऊन इतर मुगलांच्या तंबूना चुकवत दिलेरखानाच्या तंबूला घेरायला लागले. कंपनी १, २ ठरवलेल्या टेकाडापाशी आल्या. पहाटेच्या आजानाची बांग यायच्या आत गाढ झोपलेला दिलेरखानाला काही पावलांच्या आवाजाची चाहूल लागल्याने त्याने तलवार हातात घेतली. डोक्यावरील पागोटे आणि अंगावर चादर घेऊन तो शामियान्याच्या बाहेर डोकावला.
- त्यावेळी एकाएकी मराठे हल्ला करायला सज्ज असल्याचे पाहून अल्ला हो अकबर, दीन दीन अशी आरोळी देऊन त्याने आपल्या सैनिकांना जागे केले.

- मुरारबाजींनी दिलेरखानाला पाहिले आणि तलवारी ‍भिडल्या. कंपनी कमांडर आपापल्या  दिलेल्या तंबूममधील जनावरे त्यांची निगरानी करणाऱ्या लोकांवर तुटून पडले. दिलेरखानाला एकटा पाडला गेला. तोवर झालेल्या आवाजांच्या गलक्याने आसपासचे मुगल सरदार आणि सैनिक शस्त्रे घेऊन सरसावले.
- मुरारबाजींना वेढा टाकून घेरले गेले. त्या गंभीर प्रसंगात मुरारबाजींनी मोठमोठ्यांनी आपल्या सैन्याला हरहर महादेव असा वीरोचित ललकीरी देत चेव आणला.




किल्ले पुरंदरचे धाराक्षेत्र -
मुरारबाजींचे स्वराज्यासाठी बलिदान


मुराबाजींसमोर दिलेरखान होता परंतु घेरले गेल्याने शारीरिक हल्ला करायच्या प्रयत्नात त्याला समोरच्याच्या तलवारीचे वार चुकवत हल्ला करायची संधी मिळेना.

# पुरंदरचा लढा आणि मुरारबाजींची शौर्य गाथा

- ❖ मुराबाजींसमोर दिलेरखान होता परंतु घेरले गेल्याने शारीरिक हल्ला करायच्या प्रयत्नात त्याला समोरच्याच्या तलवारीचे वार चुकवत हल्ला करायची संधी मिळेना. तलवारीच्या वारांना ढालीवर घेत लागले. त्यांनी अनेकांना चपळ हालचाली करून जखमी केले. ते वीरोचित शस्त्र संचलन पाहून दिलेरखान भारावला.
- ❖ओरडून म्हणाला, ‘तू आमच्या बाजूने लढ. तुला बक्षिस आणि बहुमान देतो’. मुराबाजींनी उत्तर एका सैनिकाच्या छातीत तलवार खुपसून दिले. आता युद्ध एक विरुद्ध अनेक असे झाल्याने मुरारबाजींच्या देहावर अनेक वार होऊन शिवाजी महाराजांच्या स्वराज्य यज्ञात त्यांनी आहूती दिली.
- ❖तोवर चारी कंपन्यांचे मावळे घेरले गेल्याने ते वीरगतीला मिळाले. काही दूर लपलेल्यांना बाणांनी टिपून मारले गेले. अशा रितीने पुरंदरकिल्ल्यातील समरात मुरारबाजींची प्राणांची आहूती अजरामर झाली.

# राजगड ते पुरंदर जवळ चिल्हेवाडी पर्यंतचा शिवाजी महाराजांचा सैन्यदलासह येण्याचा शामियानाचा मार्ग



# पुरंदरवीर मुरारबाजींचे बलिदान

**नरवीर मुरारबाजी देशपांडे यांचे आवेशपुर्ण भव्य स्मारक - किल्ले पुरंदर**



भाग 1

किल्ले पुरंदर



INDIAN
AIR FORCE



INDIAN
NAVY



INDIAN
ARMY

# सध्याच्या भू सेना, नौसेना, वायुसेनेच्या तज्ज्ञ लष्करी अधिकाऱ्यांनी केलेली मांडणी